**मनीष चंदुलाल लखाणी - महाराष्ट्र ठेवीदार हित संरक्षण (एम.पी.आय.डी.) अधिनियम १९९९ चे कलम ५ अन्वये सक्षम प्राधिका-यांच्या नेमणूकीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमपीआय - २०१४ / प्र.क्र. ५१५ / पोल - ११**
जागतिक व्यापार केंद्र,
कफ परेड, मुंबई
तारीखः २५ जुलै,२०१४

**प्रस्तावना**

आर्थिक गुन्हे शाखा, मुंबई यांच्याकडील कॉ. गुन्हा.रजि. नंबर ३३ / २००२ भादंवि कलम ४२०, ४६०, सह महाराष्ट्र ठेवीदार हित संरक्षण अधिनियम १९९९ चे कलम ३ व ४ मनीष चंदुलाल लखाणी, या गुन्हयातील मालमत्ता संरक्षीत करण्यासाठी व त्याच्या चौकशीसाठी महाराष्ट्र ठेवीदार हित संरक्षण अधिनियम कायद्याचे कार्यपध्दती प्रमाणे कार्यवाही होणे आवश्यक आहे. त्यानुसार महाराष्ट्र ठेवीदार हित संरक्षण अधिनियम, १९९९ चे कलम ४ व ५ प्रमाणे कार्यवाही करण्यासाठी उप जिल्हाधिकारी दर्जापेक्षा कमी दर्जा नसलेल्या राज्य शासनाच्या अधिका-याची सक्षम अधिकारी म्हणून नेमणूक होणे आवश्यक आहे.

त्याअनुषंगाने महाराष्ट्र ठेवीदार हित संरक्षण अधिनियम, १९९९ चे कलम ४ व ५ प्रमाणे जप्त करणेकामी उप जिल्हाधिकारी दर्जापेक्षा कमी दर्जा नसलेल्या राज्य शासनाच्या अधिका-याची सक्षम अधिकारी म्हणून नियुक्ती होण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचारधीन होता.

**शासन निर्णय**

मनीष चंदुलाल लखाणी, यांचेविरुध्द दाखल आर्थिक गुन्हे शाखा, मुंबई ३३ / २००२ गुन्हयांमध्ये महाराष्ट्र ठेवीदारांच्या (वित्तीय संस्थामधील) हितसंबंधांचे संरक्षण अधिनियम, १९९९ चे कलम ५ अन्वये जप्ती आणलेल्या वित्तीय संस्थेच्या मालमत्तेवर नियंत्रण ठेवण्याकरीता तसेच या

अधिनियमाची सर्व प्रयोजने पार पाडण्याकरीता उप जिल्हाधिकारी, (भूसंपादन) क्र. ४, मुंबई उपनगर जिल्हा यांची सक्षम प्राधिकारी म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७२५१५०६१०१९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Punam Hiraman Wagde

Digitally signed by Punam Hiraman Wagde
DN: CN = Punam Hiraman Wagde, C = IN, S = MAHARASHTRA, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HOME
Date: 2014.07.25 15:56:05 +05'30'

**(पु. हि. वागदे)**
उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रत,

(१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
(२) विभागीय आयुक्त, कोकण विभाग,
(३) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई,
(४)जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर,
(५)वरिष्ठ पोलीस निरिक्षक, कक्ष - ७, आर्थिक गुन्हे अन्वेषण विभाग, मुंबई,
(६) निवडनस्ती, पोल - ११.